**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षांत राष्ट्रीय आरोग्य अभियानाकरीता निधी वितरीत करणेबाबत. (लेखाशिर्ष २२१०एफ७३८ व २२१० ई ४५५)**

**महाराष्ट्र शासन**

आदिवासी विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४ /प्र.क्र.०५/कार्यासन ६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक : १६.०५.२०२४.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३. दि.१.०४.२०२४.

२) स्वास्थ्य व परिवार कल्याण मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.जी-२७०१७/२१/२०२४-२५/एनएचएम-फाईनान्स-एफटीएस-८२७२७२४, दि.२.०५.२०२४.

३) सार्वजनिक आरोग्य विभाग, नस्ती क्र.बीयुडी-१३२४/प्र.क्र. २१९/आरोग्य-७.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येणाऱ्या राष्ट्रीय आरोग्य अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेसाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात संदर्भाधीन क्र.२ अन्वये केंद्र हिश्श्याचा रु.४५५८.०० लाख इतका निधी राज्यास वितरीत केला आहे. सदर केंद्र हिश्श्याचा निधी व समरुप राज्य हिश्श्याचा निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्रमांक ३ अन्वये प्रस्ताव प्राप्त झाला आहे. या अनुषंगाने सदर योजनेंतर्गत निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य या मुख्य लेखाशीर्षाखाली राष्ट्रीय आरोग्य अभियान या योजनेंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतूदींतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु. लाखात)**

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व राज्य हिस्सा | बाब | सन २०२३-२४ साठी अर्थसंकल्पित तरतूद | सदर शा. नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| राष्ट्रीय आरोग्य अभियान | २२१० एफ ७३८ (केंद्र हिस्सा ६०%) | ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | १३६८४.२१ | ४५५८.०० |
| | २२१० ई ४५५ (राज्य हिस्सा ४० %) | | १३६८१.४३ | ३०३८.६७ |
| | | | **एकूण** | **७५९६.६७** |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.७५९६.६७ लाख (अक्षरी रुपये पंच्याहत्तर कोटी शहाण्णव लाख सदुसष्ट हजार फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. प्रकरणी विभागप्रमुख/ नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतुन आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात आणि आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात फक्त वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५१६११३०३१९९२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2024.05.16 11:59:54 +05'30'

**( किरण कि.पवार )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
६) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
८) महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१०) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११) वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२) सार्वजनिक आरोग्य विभाग (आरोग्य-७), मंत्रालय, मुंबई.
१३) कार्यासन अधिकारी (का-८), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग.